**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे उटंबर कोळीवाडा (ता.दापोली, जि.रत्नागिरी) नळ पाणी पुरवठा योजना या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु १३१६/प्र.क्र.२१४/पापु-०६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ मार्च, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.९ ऑक्टोबर,२०१३.
२) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४./प्र.क्र.२२/पापु-०७,दि.९ जुलै,२०१४
३) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/ प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ९ जुलै,२०१४.
४) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४.
५) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१५.
६) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फेब्रुवारी, २०१५.
७) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
८) उच्चाधिकार समितीच्या दिनांक २१ ऑक्टोबर, २०१५ च्या बैठकीचे इतिवृत्त.
९) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जि.प.रत्नागिरी यांचे पत्र क्र.रजिप /ग्रापापु / तांशा-२/५४९७, दिनांक १३.१२.२०१६ तसेच क्र.रजिप/ग्रापापु/तांशा-२/१, दिनांक २.१.२०१७ चे पत्र
१०) भारत सरकार, पेयजल एवं स्वच्छता मंत्रालय यांचे अ.शा.पत्र क्र.W-११०४१/९/२०१५-Water-I, दिनांक १९ फेब्रुवारी, २०१६

प्रस्तावना -

मौजे उटंबर कोळीवाडा (ता.दापोली,जि.रत्नागिरी) नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास ग्रामपंचायत ठराव क्र.१०(०१) दि.५.१.२०१७ रोजी ठराव संमत केला आहे. या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.६६.५७ लक्ष एवढया ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद रत्नागिरी यांनी माहे जानेवारी, २०१७ मध्ये तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च रु.७४४१/- हा जिल्हा परिषदेच्या विहित निकषापेक्षा जास्त असल्यामुळे नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद रत्नागिरी यांनी शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर योजनेस दि.२१.१०.२०१५ रोजीच्या बैठकीत शासनस्तरावरील उच्चाधिकार समितीने मान्यता दिली आहे. सदर योजनेच्या छाननी अंती ट्रायल रन व इतर खर्च कमी करुन योजनेची किंमत रु.६५.८४ लक्ष एवढी ढोबळ अंदाजपत्रकीय किंमत होत आहे.

केंद्र शासनाच्या दि.१९.२.२०१६ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सूचनानुसार योजनेचा उद्भव सक्षमीकरण व सुधारणा अंतर्गत योजना घेण्याबाबत मार्गदर्शक सूचना प्राप्त झाल्या आहेत. मौ.उटंबर कोळीवाडा गावातील अस्तित्वातील योजना जून्या झाल्या असून, सदर गावास टँकरने पाणी पुरवठा करावा लागतो. अस्तित्वातील नळ पाणी पुरवठा योजनेचे आयुष्यमान संपत आले आहे. शासनाच्या दि.९.७.२०१४ च्या शासन निर्णयामधील सूचनांनुसार मंजूरी मिळालेल्या वार्षिक कृती आराखडयात समावेश असलेल्या योजनांना मंजूरी देता येईल अशी तरतूद असल्याने, सदर योजनेचा सन २०१७-१८ च्या वार्षिक कृती आराखडयात समावेश करण्याबाबतची कार्यवाही जिल्हा परिषदेकडून सुरु आहे. त्यानुसार सदर गावाच्या उपरोक्त दरडोई खर्चाच्या योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**:-

मौजे उटंबर कोळीवाडा (ता.दापोली,जि.रत्नागिरी) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.७४४१/- एवढया वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु.६५,८३,८६८/- (रुपये पासष्ट लाख त्र्याऐंशी हजार आठशे अडुसष्ट फक्त) इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) उटंबर कोळीवाडा नळ पाणी पुरवठा योजना ता.दापोली, जि.रत्नागिरी या योजनेचा सन २०१७-१८ या वर्षाच्या कृती आराखडयात केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार समावेश करुन सदर कृती आराखडयास मान्यता मिळाल्यानंतर योजनेची प्रत्यक्षात अंमलबजावणी करण्यात यावी.
२) सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी योजना पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, याची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.
३) योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरीत करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन क्र.२ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.
४) योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरुस्तीसाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबधीत ग्रामपंचायतीने किमान रु.२२००/-प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी पाणीपट्टी निश्चित करावी. सदर पाणी पट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी स्वत: करावी. तसेच प्रकल्पित वर्षासाठी प्रस्तावित असलेल्या पाणीपट्टीद्वारे भागेल एवढया पर्यंत देखभाल दुरुस्ती खर्च निश्चित करावा. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.
५) योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.
६) संपूर्ण गाव हागणदारी मुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

८) योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावी.

९) मार्गदर्शक सूचनेनुसार योजनेची कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.

१०) जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची पूर्व परवानगी घ्यावी. शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय योजनेचे कार्यादेश देण्यात येऊ नये.

११) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वेळोवळी वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१२) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधीन क्र.२ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांची व प्रचलीत अटींची पूर्तता करणेत यावी.

१३) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणी संदर्भात वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांची राहील.

१४) मंजूर केलेल्या योजनेत शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय तांत्रिक बदल करण्यात येवू नये.

१५) योजना मंजूर किंमतीत पूर्ण करण्यात यावी.

३. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत केंद्र तथा राज्य शासनाच्या निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५१७३७५५६६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vandana
Suresh Sangar

Digitally signed by Vandana Suresh Sangar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2765f0ac1ab0637b18ffff33aa719a938cb7024482c205d84eb8f4954c23fcc, cn=Vandana Suresh Sangar
Date: 2017.03.16 16:09:29 +05'30'

( वंदना सनगर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री, महोदय यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.मंत्री (पा.पु.व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (पा.पु.व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
६) प्रधान सचिव, ग्रामविकास व पंचायतराज / जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई.
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
९) जिल्हाधिकारी, रत्नागिरी
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी
११) मुख्य अभियंता (नागरी व ग्रामीण),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१२) संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१४) जिल्हा वरिष्ठ भुवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रत्नागिरी
१५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, रत्नागिरी
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी
१७) कार्यासन पापु-०४, ०५, ०९, १३, १७, १८, संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवडनस्ती (कार्यासन पापु-०६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.